महाराष्ट्र वैद्यकीय व आरोग्य सेवा,
गट-ब मधील बदल्याबाबत.
डॉ.सुजाता महिपाल भीमकर, वै. अ.
डॉ.सारिका दशरथ लाडगे, वै.अ.

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक आरोग्य विभाग**
**शासन आदेश क्रमांकः संआसे-२०२३/प्र.क्र.१२५/सेवा-१**
गोकुळदास तेजपाल रुग्णालय आवार,संकुल इमारत,८वा मजला,
मंत्रालय, मुंबई -४०० ००१
तारीख: २२ मे, २०२३

**शासन आदेश -**

महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्ये पार पाडताना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५ च्या कलम ४ (४)(दोन) व कलम ४(५) मधील तरतुदीनुसार सक्षम प्राधिकाऱ्याच्या मान्यतेने वैद्यकीय अधिकारी, गट-ब मधील वैद्यकीय अधिकाऱ्यांच्या विनंतीनुसार खालीलप्रमाणे बदलीने पदस्थापना करण्यात येत आहे.:-

| अ.क्र. | अधिकाऱ्याचे नांव व सध्याची पदस्थापना | बदलीने पदस्थापना |
|---|---|---|
| १ | डॉ.सुजाता महिपाल भीमकर, वैद्यकीय अधिकारी,गट-ब प्राथमिक आरोग्य केंद्र, दानापुर. ता.तेल्हारा, जि.अकोला अंतर्गत आयुर्वेद दवाखाना माळेगाव बाजार,जि.अकोला | आयुर्वेद दवाखाना, कानशिवणी, प्रा.आ.केंद्र काटेपुर्णा कुरणखेड, जि.अकोला. |
| २. | डॉ. सारिका दशरथ लांडगे, वैद्यकीय अधिकारी,गट-ब आयुर्वेद दवाखाना, आंतरवली टेम्बी, ता.घनसावंगी,जि.जालना | जिल्हा साथरोग अधिकारी तथा आयुष अधिकारी, औरंगाबाद. |

२. बदली करण्यात आलेल्या अधिकाऱ्यास त्यांच्या नवीन पदस्थापनेच्या ठिकाणी हजर होण्याकरीता तात्काळ कार्यमुक्त करण्यात यावे आणि सबंधित अधिकाऱ्याने त्यांना दिलेल्या पदस्थापनेच्या ठिकाणी त्वरीत हजर होऊन त्याबाबतचा अहवाल संचालक, आरोग्य सेवा आयुक्तालय, मुंबई यांना व शासनास सादर करावा.

३. बदली झालेल्या अधिकाऱ्यांना कोणत्याही प्रकारची रजा मंजूर करण्यात येऊ नये, अन्यथा रजा मंजूर करणाऱ्या सक्षम प्राधिकाऱ्याविरुध्द शिस्तभंगविषयक कारवाई करण्यात येईल.

४. बदली झालेल्या अधिकाऱ्यांनी त्यांना कार्यमुक्त केल्यानंतर, नवीन पदस्थापनेवर ताबडतोब रुजु व्हावे, जे अधिकारी या कालमर्यादेचे पालन करणार नाहीत आणि पदस्थापनेच्या ठिकाणी हजर न होता परस्पर गैरहजर राहतील, अशा अधिकाऱ्यांची अनुपस्थिती “अनधिकृत अनुपस्थिती” म्हणून समजण्यात येईल व पर्यायाने त्यांच्या सेवेत खंड होईल, याची जाणीव सर्व संबंधितांना करुन देण्यात येत आहे.

५. जे अधिकारी त्यांच्या पदस्थापनेच्या ठिकाणी हजर होणार नाहीत, त्यांचे विरुध्द संचालनालयाने वेळीच प्रशासकीय कारवाई सुरु करावी व आवश्यकतेनुसार प्रस्ताव शासनाच्या मान्यतेसाठी सादर करावा. या संदर्भात वेळोवेळी शासनास अवगत करावे व अनुपालन अहवाल शासनास विहित कालमर्यादेत सादर करावा.

६. बदलीच्या आदेशात बदल करुन घेण्यासाठी कोणत्याही अधिकाऱ्याने प्रत्यक्ष वा अप्रत्यक्ष दबाव आणण्याचा प्रयत्न केल्यास असे अधिकारी शिस्तभंगविषयक कारवाई करण्यास पात्र ठरतील.

७. विनंती बदली असल्याने संबधीतांना पदग्रहण अवधी/ प्रवास भत्ता अनुज्ञेय राहणार नाही.

८. सदर आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्तळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक 202305221754132117 असा आहे. हा आदेश डीजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करुन काढण्यात येत आहे. महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SACHIN SHAMKANT DESAI

Digitally signed by SACHIN SHAMKANT DESAI
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PUBLIC HEALTH DEPARTMENT, 2.5.4.20=52275339d48b6fd35ef523ecd953ba59cbb2b2b4d4413dff8b3f2fb17710505f, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=6FF04EBFFAB4F962AD757B0E36E3A96AB5DB4421F6C9568763153DEA139498B2, cn=SACHIN SHAMKANT DESAI
Date: 2023.05.23 11:36:22 +05'30'

(स.शा.देसाई)
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत:-

१) मा.मंत्री (सार्वजनिक आरोग्य व कु.क.)यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
२) मा.अपर मुख्य सचिव (सार्वजनिक आरोग्य विभाग ) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
३) आयुक्त, आरोग्य सेवा तथा अभियान संचालक राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई.
४) संचालक, आरोग्य सेवा आयुक्तालय, मुंबई.
५) सहसंचालक, आरोग्य सेवा(अर्थ व प्रशासन), आरोग्य सेवा आयुक्तालय, मुंबई.
६) उपसंचालक,आरोग्य सेवा, अकोला मंडळ अकोला.
७) उपसंचालक, आरोग्य सेवा, औरंगाबाद मंडळ, औरंगाबाद.
८) महालेखापाल (लेखा परीक्षा) महाराष्ट्र - १ , मुंबई /महाराष्ट्र - २, नागपूर.
९) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र - १ , मुंबई /महाराष्ट्र - २, नागपूर.
१०) जिल्हा कोषागार अधिकारी, अकोला / औरंगाबाद.
११) जिल्हा शल्य चिकित्सक, जिल्हा रुग्णालय, अकोला / औरंगाबाद.
१२) जिल्हा आरोग्य अधिकारी, जिल्हा परिषद, अकोला / औरंगाबाद.
१३) संबंधित अधिकारी (संचालक, आरोग्य सेवा आयुक्तालय, मुंबई यांचेमार्फत)
१४) निवड नस्ती (सेवा - १ )